**जालना-खामगाव या नवीन रेल्वे मार्ग प्रकल्पाकरीता राज्य शासनाचा आर्थिक सहभाग देण्यास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: आरएलवाय-२०१४/११३/प्र.क्र.२७/परि-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :-१५/०३/२०२४.

**संदर्भ :** १) भारत सरकार, रेल्वे मंत्रालय (रेल्वे बोर्ड) यांचे पत्र क्र. EW/६८९/S/३४५-II/FLS/J-KHMN NL Project, दि.२६/१२/२०२३.

२) मुख्य अभियंता (निर्माण, उत्तर), मध्य रेल्वे यांचे पत्र क्र.EW/६८९/S/३४५-II/ FLS, दि.३०/०१/२०२४.

**प्रस्तावना :-** राज्याच्या ग्रामीण विशेषत: अविकसीत भागातील रेल्वे प्रकल्पांना गती मिळावी व हे प्रकल्प जलद गतीने पुर्ण व्हावेत याकरीता अशा निवडक प्रकल्पांमध्ये ४०% ते ५०% आर्थिक सहभाग देण्याचे धोरण राज्य शासनाने स्वीकारले आहे.

जालना-खामगाव या नवीन रेल्वे प्रकल्पाच्या कामाचा केंद्र शासनाच्या अंम्ब्रेला योजनेंतर्गत सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पामध्ये आवश्यक मान्यतेच्या अधीनतेने समावेश करण्यात आलेला आहे. सदर रेल्वे मार्गालगत पर्यटकांना आकर्षित करणारे लोणार सरोवर (बुलढाणा जिल्हा), श्री संत गजानन महाराज मंदिर (शेगाव), राजमाता जिजाऊ जन्मस्थान (सिंदखेडराजा), रेणुका देवी मंदिर (चिखली), गुरु गणेश तपोधाम (जैन मंदिर, जालना) या पर्यटन स्थळांचा समावेश आहे. देशभरातून या रेल्वे मार्गामुळे परिसरातील लोकांच्या सततच्या मागणीची पूर्तता होईल आणि मराठवाडा तसेच पश्चिम विदर्भाच्या ग्रामीण भागाचा शाश्वत विकास होईल, असे नमुद करुन सदर रेल्वे प्रकल्पाकरिता महाराष्ट्राने ५०% आर्थिक सहभाग द्यावा, अशी विनंती रेल्वे विभागाने त्यांच्या दि.२६/१२/२०२३ रोजीच्या पत्रान्वये केलेली आहे.

जालना-खामगाव या नवीन ब्रॉडगेज रेल्वे प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार केला असून त्यानुसार या प्रकल्पाची अंदाजित किंमत/ खर्च (जमीन अधिग्रहणासह) रू.४९०७.७०/- कोटी इतका असल्याचे मध्य रेल्वेने त्यांच्या संदर्भाधीन क्र.२ वरील दि.३०/०१/२०२४ रोजीच्या पत्रान्वये राज्य शासनास कळविले आहे.

रेल्वे विभागाने केलेल्या विनंतीनुसार तसेच मध्य रेल्वेने तयार केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालास अनुसरून जालना-खामगाव या नवीन ब्रॉडगेज रेल्वे मार्ग (१६२ कि.मी.) प्रकल्पात केंद्र सरकार (रेल्वे मंत्रालय) : राज्य शासन यांचा ५०:५० टक्के आर्थिक सहभाग असल्याने यानुषंगाने एकूण प्रकल्प किंमतीच्या ५०% म्हणजेच रू.२४५३.८५ कोटी एवढ्या खर्चासाठी राज्य शासनाच्या आर्थिक सहभागास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार राज्य मंत्रिमंडळ बैठकीमध्ये पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आले आहेत.

**शासन निर्णय:-**

१) जालना-खामगाव या नवीन ब्रॉडगेज रेल्वे मार्ग प्रकल्पाकरीता जमिनीच्या किंमतीसह येणाऱ्या रु.४९०७.७० कोटी इतक्या प्रकल्प किंमतीच्या ५०% म्हणजेच रू.२४५३.८५ कोटी इतक्या राज्य शासनाच्या आर्थिक सहभागास मान्यता देण्यात येत आहे.

२) राज्य शासनाच्या हिश्श्याच्या रु.२४५३.८५ कोटी इतक्या रकमेमध्ये जमिनीची रु.२७४.९२ कोटी इतकी किंमत अंतर्भुत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) राज्य शासनाच्या हिश्श्यामधील रक्कम निधीच्या उपलब्धतेनुसार तसेच प्रकल्पावरील झालेल्या प्रत्यक्ष खर्चास अनुसरुन रेल्वे विभागाने मागणी केल्यानंतर उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर बाबी वरील येणारा खर्च मागणी क्र.बी-७, ३००१ - भारतीय रेल्वे-धोरण निश्चिती, संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, ००, ८०० - इतर खर्च, (००), (००) (०२) - रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग (कार्यक्रम) (३००१-००५४), ३२- अंशदाने या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५) सदरचा शासन निर्णय राज्य मंत्रिमंडळाने दि.१३/०३/२०२४ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१७५७२४६३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MADKAR PRATAP SAMPATRAO

Digitally signed by MADKAR PRATAP SAMPATRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=691ba5cde50be5ad4d70b5410e666a3f513b4fd3934f0227b3aab4ff49ee9941, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B6C9D92AA5599BE94C2F37BF0363AAF3D243DE73A6A2F15A0AE751006929371A, cn=MADKAR PRATAP SAMPATRAO
Date: 2024.03.15 18:07:57 +05'30'

**( प्रताप माडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उप मुख्यमंत्री (गृह), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६) मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
९) मा.उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१०) मा.विरोधी पक्षनेता (विधान सभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
११) मा.विरोधी पक्षनेता (विधान परिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१२) सर्व मा.संसद सदस्य (महाराष्ट्र राज्य)
१३) मा.विधान सभा सदस्य (सर्व)

१४) मा.विधान परिषद सदस्य (सर्व)
१५) अतिरिक्त सदस्य (निर्माण), केंद्रीय रेल्वे बोर्ड, रेल्वे मंत्रालय, रेल भवन, नवी दिल्ली.
१६) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव (वित्त/नियोजन/महसूल/वने) मंत्रालय, मुंबई.
१८)मा.महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
१९) महा व्यवस्थापक, मध्य रेल्वे, छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस, मुंबई.
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२१) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
२२) अर्थसंकल्प-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) वित्त विभाग (व्यय-८/अर्थ-११), मंत्रालय, मुंबई.
२४) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
२५) निवड नस्ती, परिवहन-५.